पूरग्रस्त शासकीय/निमशासकीय व जिल्हा परिषद, अधिकारी/कर्मचा-यांना ३ महिन्यांचे अग्रिम वेतन बिनव्याजी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक : सीएमएफ-१००५/प्र.क्र.५४/०५/१६-अ.

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २३ ऑगस्ट,२००५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यात दि.२६ व २७ जुलै, २००५ मध्ये अभूतपूर्व अतिवृष्टी/पुरामुळे व भूस्खलन झाल्याने, बहुतांश जिल्हया, उदा.मुंबई, ठाणे, रायगड, सांगली, सोलापूर इत्यादी जिल्हयात जनतेची वित्त, मालमत्ता, मनुष्य हानी झाली. शेतीचे देखील अपरिमित नुकसान झाले. यामध्ये सर्वसाधारण जनतेबरोबर शासकीय/निमशासकीय, जिल्हा परिषद , नगर पालिका व नगर परिषद मधील अधिकारी/कर्मचा-यांचे अतिवृष्टी/पुरामुळे नुकसान झाले. यामुळे राज्यातील बाधीत शासकीय/निमशासकीय, इत्यादि अधिका-यांना/कर्मचा-यांना आर्थिक सहाय्य करण्याचा, प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयाद्वारे शासनाने राज्यातील शासकीय/निमशासकीय, जिल्हा परिषद, नगर पालिका, नगर परिषद इत्यादि कर्मचारी कि, ज्यांचे दि.२६ व २७ जुलै, २००५ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे तसेच पुरामुळे, भुस्खलनामुळे मनुष्य, वित्त व मालमत्तेचे नुकसान झाले आहे अशा अधिकारी/कर्मचा-यांना ३ महिन्याचे पूर्ण वेतनाची अग्रिम रक्कम बिनव्याजी देण्याचा निर्णय घेतला आहे. हा अग्रिम सप्टेंबर अखेरपर्यंत देण्यात यावा व त्याची वसुली जानेवारी २००६ पासून समान ३६ सलग मासिक हप्त्यांमध्ये करावी. शासकीय अग्रिमासाठी असलेल्या नियमानुसार त्याचे लेखे ठेवण्यात यावे. जे कर्मचारी नजिकच्या काळात सेवानिवृत्त होत असतील तर त्यांचे उर्वरित हप्ते त्यांना देय असलेल्या रक्कमेतून एकरकमी वसूल करावी.

२. जे अधिकारी/कर्मचारी, पुरामुळे बाधित झाले असतील त्यांनी त्यांच्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांचेकडे अग्रिमासाठी अर्ज करावा. त्यामध्ये पुरामुळे झालेल्या नुकसानीबाबतचा तपशिल नमूद करावा.

३. विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांनी अशा अर्जावर संबंधित जिल्हाधिकारी यांनी ज्या अधिकारी/कर्मचारी यांना निराधार व्यक्ती/ कुटुंब समजून सानुग्रह अनुदानाचे वाटप केले असेल अशा बाधित अधिकारी / कर्मचाऱ्यांना ३ महिन्याच्या पूर्ण वेतनाच्या रक्कमेएवढे अग्रिम त्वरित उपलब्ध करुन द्यावे.

४. हे आदेश शासकीय/निमशासकीय, जिल्हा परिषद, नगर पालिका, नगर परिषद इत्यादिंना लागू रहातील.

५. जिल्हा परिषद, नगर पालिका व नगर परिषद यांनी त्यांच्या बाधित कर्मचा-यांना हे अग्रिम त्यांच्या निधीतून उपलब्ध करुन द्यावेत व त्यांनी त्याची वर नमूद केल्यानुसार समान ३६ हप्त्यात वसूली करावी.

६. हे ३ महिन्याचे अग्रिम वेतन पुरग्रस्त निधीमधून देय असलेल्या मदतीव्यतिरिक्त राहिल.

७. हे ३ महिन्याचे वेतन अग्रिम बिनव्याजी राहिल. यासाठी होणारा खर्च, वेतन व भत्ते, ज्या लेखा शीर्षामध्ये खर्ची टाकले जातात त्या लेखाशीर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग व महसूल व वन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०६/०५/विनियम,दि.४.८.०५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.ग.पवार )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,

२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

(कृ.मा.प.)

३. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*६.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*७. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*८. प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
*९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* १०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*११.सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
*१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
१३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
१४.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-२, नागपूर,
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६.निवासी व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८.सर्व महानगरपालिका यांचे आयुक्त,
१९. सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०.सर्व नगरपरिषदा / नगरपालिका यांचे मुख्य अधिकारी,
२१.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
२२.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिद्धीपत्रक काढण्याच्या विनंतीसह)
२३.मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
२४.वित्त विभाग/विनियम, मंत्रालय, मुंबई,
२५.मंत्रालयातील सर्व विभाग,
२६.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२७.निवड नस्ती.

*पत्राने

---------